20040811170057002 - 2402

प्रतिनियुक्तीबाबत.....

गुणवत्ता दर्जा सुधार योजने अन्वये.

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्रशिक्षण आणि सेवायोजन विभाग,
शासन निर्णय क्रमांक – प्रतिनि–२०९५/१६५५७/(६३५/९५)/तांशि–४
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२,

दिनांक – २० नोव्हेंबर, १९९६.

शासन निर्णय :– तंत्रशिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखाली येणाऱ्या शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालयातील व शासकीय तंत्रनिकेतनातील अध्यापकांना केंद्र शासनाच्या गुणवत्ता दर्जा सुधार योजने (क्यू.आय.पी.) अंतर्गत/पीएच. डी. प्रशिक्षणासाठी तसेच जागतिक बँक सहाय्यित प्रकल्पांतर्गत एम. ई. / एम. टेक, एम. टेक. एड. इत्यादी पदव्युत्तर उच्च शिक्षणासाठी खाली नमूद केलेल्या अटींवर प्रतिनियुक्तीवर पाठविण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

१] प्रतिनियुक्ती पूर्ण निर्धारित कालावधीकरिता असेल.

२] प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्यांच्या जागेवर दुसऱ्या व्यक्तींची नियुक्ती करण्यास मान्यता असेल.

३] प्रतिनियुक्तीवरील अधिकाऱ्यास खालील अट क्रमांक ८ च्या अधीन राहून त्यांच्या प्रतिनियुक्तीच्या कालखंडात त्यांना वेतन व भत्ते शासन अदा करील.

४] त्यांच्या वेतना व्यतिरिक्त ज्या संस्थेत प्रतिनियुक्तीवर पाठविण्यात आले त्या संस्थेने त्यांना विद्यावेतन/शिष्यवृत्ती दिल्यास ती स्वीकारण्यास त्यांना परवानगी देण्यात यावी.

५] प्रतिनियुक्तीच्या ठिकाणी जाण्यासाठी किंवा प्रतिनियुक्तीच्या कालावधीत तसेच प्रतिनियुक्ती संपल्यावर मुख्यालयात परत येण्यासाठी त्यांना प्रवासभत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहणार नाही.

६] प्रशिक्षणासाठी पाठविण्यात येणाऱ्या अध्यापकांना त्यांच्या उर्वरीत सेवाकालावधीत कधीही असाधारण रजा घेता येणार नाही व ती केवळ प्रशिक्षणासाठी जाण्यापूर्वी घ्यावी लागेल.

७] पी. एच. डी. तसेच पदव्युत्तर अभ्यासक्रम अध्ययनासाठी करारनिर्दिष्ट कालापेक्षा जास्त कालावधी वाढवून मिळण्यास उमेदवाराने अर्ज केल्यास प्रतिनियुक्तीच्या वाढलेल्या कालावधीसाठी देय व अनुज्ञेय रजा समजण्यात यावी.

८] प्रशिक्षण पूर्ण झाल्यानंतर शासनाची सलग ६ वर्षे सेवा करण्याचे बंधपत्र त्यांना प्रशिक्षणासाठी जाण्यापूर्वी द्यावे लागेल. हे बंधपत्र त्यांना शासन पत्र, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-१०६८/डी-१०, दिनांक १५.१०.१९६८ सह शासन ज्ञापन, सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-१०७९/ दिनांक २१.६.१९७९ मध्ये विहित केल्याप्रमाणे राहील.

९] जे प्रशिक्षणार्थी त्यांचे प्रशिक्षण अर्धवट सोडून येतील किंवा जे बंधपत्राप्रमाणे शासनाची सेवा करणार नाहीत त्यांच्याकडून शासनाने त्यांच्यावर केलेला संपूर्ण खर्च प्रचलित व्याजासह वसूल करण्यात येईल.

१०] प्रतिनियुक्तीचा कालावधी सेवाकाळ म्हणून समजण्यात यावा.

११] सदर प्रशिक्षणासाठीची प्रतिनियुक्ती त्यांच्यापेक्षा ज्येष्ठ असलेल्या कर्मचाऱ्यांच्या अगोदर पदोन्नतीसाठी आधारभूत ठरू शकणार नाही.

१२] हे आदेश नोव्हेंबर ९५ पासून अंमलात येतील.

२. हे आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या संमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ५०२९/बारा, दिनांक ५.६.९६ नुसार व वित्त विभागाच्या संमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ११४३३/सेवा-९, दिनांक १८.६.९६ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[ न. नं. पाटील ]
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति –
संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-१ व २ [लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा].
प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये, पुणे, कराड, औरंगाबाद, अमरावती, चंद्रपूर, जळगांव.
प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन [सर्व]
प्राचार्य, शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय, कराड.
उपसंचालक, तंत्रशिक्षण, सर्व विभागीय कार्यालये.
सचिव, तंत्रशिक्षण परीक्षा मंडळ, मुंबई.
कार्यासन तांशि-२, व्यशि-५, मशि - २.
निवड नस्ती तांशि-७.
सामान्य प्रशासन विभाग [बारा]
वित्त विभाग [सेवा-९]

एसएसए.
२०.११. निवड नस्ती . तांशि. ७

निर्गमित
२.७.९६